**अंतरगाव लघु प्रकल्प तालुका कळंब, जि. यवतमाळ धरण व मुख्य कालव्यावरील मातीकाम व बांधकामाचा विशेष दुरुस्ती व पुन:स्थापनेच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: प्रमा-२०१८/(प्र.क्र.४४१/२०१८)/सिं.व्य.(कामे)**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक: ०५/०१/२०१९.

**वाचा:-** १. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपुर यांचे पत्र जा.क्र.९४५०/कातां-३(१)/अंतरगाव विशेष दुरुस्ती/२०१८ दि.२५/०९/२०१८.

२. शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.

३. शासन निर्णय - संकीर्ण-२०१६/(२७/२०१६)/लपा-२, दि.२६/०५/२०१७.

**प्रस्तावना:-**

अंतरगाव लघु प्रकल्प हा ता. कळंब जि.यवतमाळ येथे अंतरगाव गावाजवळील स्थानिक नाल्यावर आहे. सदर प्रकल्पाचे स्थळ मानचिन्हावरील रेखांश २० १७ ३० अक्षांश ७८ २५ ०० वर आहे. सदर प्रकल्पाचे घळ भरणीचे काम सन १९८६ मध्ये पूर्ण झाले सन १९८७-८८ पासून प्रत्यक्ष सिंचनास सुरुवात झालेली असून हा प्रकल्प सिंचन व्यवस्थापनास सन १९९० मध्ये हस्तांतरीत करण्यात आला. प्रकल्पाच्या धरणाची लांबी १०७८ मी. असून सांडव्याची लांबी ७९ मी. आहे. एकूण जलसाठा ७.२० दलघमी असून उपयुक्त जलसाठा ६.२८ दलघमी आहे. प्रकल्पास डावा व उजवा असे २ मुख्य कालवे असून त्यांची लांबी अनुक्रमे १५.१८ कि.मी. व ६.० कि.मी. असुन लघुपाटाची एकुण लांबी १९.४५ कि.मी. आहे. त्यांची विसर्ग क्षमता अनुक्रमे ०.८६६ घमी/सेकंद व ०.२५७ घमी/सेकंद इतकी आहे. कालव्याची वितरण प्रणाली मातीमधील असून काही भागात कालवा भराव भागातून गेलेला आहे. त्यामुळे त्या भागात कालवा सतत पाझरत असतो. कालवा वितरण प्रणालीचे कामास ३२ वर्षाचा कालावधी झाल्यामुळे त्यावरील बांधकामाची तुटफुट झालेली आहे. कालवा हा काळ्या मातीमधुन असल्यामुळे गाळ साचतो व भराव भागातून कालवा फुटतो. सिंचनाच्या दृष्टीने काही प्रमाणात डागडुजी करुन सिंचन केल्या जाते. इत्यादी कारणामुळे कालव्याचा विसर्ग कमी होऊन पुच्छ भागापर्यंत पाणी पोहचु शकत नाही. त्यामुळे अंतरगाव, डोंगरखर्डा, सराटी, मुसळ, पालोटी,नागठाण,मेटीखेडा व किन्हाळा येथील शेतकरी दरवर्षी सिंचनापासून वंचित आहेत.सदर कामाची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधी, पाणी वापरसंस्थेने व लाभक्षेत्रातील शेतकऱ्यांनी वेळोवेळी केलेली होती. या अनुषंगाने शासन निर्णय संदर्भ क्र.२ व ३ येथील शासन निर्णयान्वये विभागास देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर कामाकरीता विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>:-**

अंतरगाव लघु प्रकल्प तालुका कळंब, जि. यवतमाळ कालवा वरील मातिकाम व बांधकामाचा पुन:स्थापनेच्या कामास विशेष दुरुस्ती अंतर्गत रु. ३,७१,०२,७५८/-,स्वामित्व शुल्क रु. २७,०१,४१६ ५% अनुषंगिक व १ टक्का वर्कचार्ज एस्टॅब्लीशमेंट व १२% जीएसटी खर्च रु. ७८,२०,३८६/-, अशा एकूण रु. ४,९४,७१,३५०/- (रू. चार कोटी चौ-यान्नव लक्ष, एक्काहत्तर हजार, तीनशे पन्नास फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये विभागास दिलेल्या आधिकारान्वये व आं.वि.स. व उ.स. यांच्या सहमतीने खालील अटींच्या अधिन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे), ०१.०१.२०१५ मधील मागदर्शक सूचनांचे पालन करणे अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे महामंडळावर बंधनकारक आहे.

२. शासन पत्र दि.०४/०६/२०१६ अन्वये तपासणी सूचीतील मुद्दे आर्थिक निकष मा. राज्यपाल यांच्या निर्देशानुसार २ % मर्यादेत निधी खर्च करणे, दायित्व निर्मिती मर्यादेत राहण्यासाठी कामाचे दोन वर्षाचे नियोजन करणे याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

३. तांत्रिक मान्यतेपूर्वी बांधकामाचे सविस्तर सर्वेक्षण व संकल्पनावर आधारित तरतूद करण्याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

४. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने दरसूची बाह्यबाबी व वहन अंतरे तपासून अंदाजपत्रकास सक्षमस्तरावर तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

५. पाणी वापर सदस्यांना विश्वासात घेऊनच आवश्यक तरतूद करणे. प्रकल्पावरील पाणी वापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे नियोजन काम सुरु करण्यापूर्वी करावे, कामे पूर्ण झाल्यानंतर संपूर्ण लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करावे याची जबाबदारी अधीक्षक अभियंता यांची राहील.

६. माती कामे व गवत झाडे / झुडपे काढण्याची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध मशिनरीने करावीत.

७. प्रस्तावीत कामांमुळे खोदकाम/ तोडफोड उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

८. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा. सदरची कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचा पूर्णत्व अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

९. विषयांकित प्रमा अंदाजपत्रकातील तरतूदी, दर, वहनअंतर, संकल्पन व इतर तांत्रिक निकष याबाबतची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांची राहील.

१०. सदर प्र.मा. अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या

संदर्भात प्रचलित शासन निर्णय, CWC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दत याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी..

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०२ लघु पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (११) विदर्भ प्रदेश, (११) (०१) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०२ ७४९९) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/२७/२०१६/लपा-०२, दि.२६/०५/२०१७ मध्ये विहित केल्यानुसार कामांच्या खर्चाबाबतीत रू. ५.०० कोटी पर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार आं.वि.स व उ.स. यांच्या सहमतीने प्रदान करण्यात आलेल्या आधिकारानुसारहा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे) कार्यासनाच्या नोंदवही क्र.११ सन २०१८-१९ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०१९०१०५१६४४५९१०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2019.01.05 16:50:41 +05'30'

(अ. अ. कपोले)
शासनाचे उप सचिव

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय.
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५. मा.विरोधीपक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
६. मा.विरोधीपक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१३. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
१४. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती,
१५. आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. अधीक्षक अभियंता, यवतमाळ सिंचन मंडळ, यवतमाळ,
१७. सिं.व्य. (कामे) कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक:प्रमाप्र-२०१८/ (प्र.क्र.४४१/२०१८)/ सिं.व्य.(कामे), दि. ०५/०१/२०१९ चे सहपत्र**

## परिशिष्ट-अ

| अ.क्र. | तपशिल | रक्कम रु. |
|---|---|---|
| १ | मातीकाम | ५६,७१,२०७/- |
| २ | धरण सुरक्षितता | १३,४३,१४५/- |
| ३ | बांधकाम पुन:स्थापना | २,४९,७५,६७५/- |
| ४ | अस्तरीकरण | ६५,०८,४४८/- |
| ५ | एकूण | ३,८४,९८,४७५/- |
| ६ | स्वामित्व शुल्क | ३१,५२,४८९/- |
| ७ | एकत्रित शुल्क (५% संकीर्ण, १ टक्का वर्कचार्ज एस्टॅब्लीशमेंट व १२% जीएसटी) | ७८,२०,३८६/- |
| ८ | एकूण प्रस्तावाची किंमत (रू. चार कोटी चौ-यान्नव लक्ष, एक्काहत्तर हजार, तीनशे पन्नास फक्त) | ४,९४,७१,३५०/- |

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2019.01.05 16:52:32 +05'30'

**(अ. अ. कपोले)**
शासनाचे उप सचिव